**सातारा सैनिकी शाळेच्या नूतनीकरणासाठी सन २०१९ - २० या आर्थिक वर्षात रु. ५६.८५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सासैशा-२०१६/प्र.क्र.६७/एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ३२
तारीख: ०७ डिसेंबर, २०१९

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांक सासैशा-२०१७/प्र.क्र.६७/एसएम-६, शालेय शिक्षण विभाग, दिनांक १६.०१.२०१८
२) शासन निर्णय क्रमांक सासैशा-२०१७/प्र.क्र.६७/एसएम-६, शालेय शिक्षण विभाग, दिनांक १६.०३.२०१८
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पूरक-२०१९/प्र.क्र.९३/अर्थ-३, दिनांक ०९.०७.२०१९
५) प्राचार्य, सातारा सैनिक स्कूल यांचे क्र.३३८/एस/क्यू/२०१९-२०/१३४४, दि. १५.०४.२०१९ चे पत्र

प्रस्तावना :-

सातारा सैनिकी शाळेची स्थापना दि. २३ जून १९६१ रोजी झाली असून सदर शाळा ही देशातील पहिली सैनिकी शाळा आहे. महाराष्ट्रातील तळागळातील व सर्व स्तरावरील गरीब व होतकरू मुलांना राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीच्या माध्यमातून भारतातून सैन्य दलात अधिकारी पदावर संधी मिळावी, हा या शाळेचा मुख्य उद्देश आहे. या शाळेतून मोठया प्रमाणावर विद्यार्थी राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीमध्ये आतापर्यंत भरती झाले आहेत.

सातारा सैनिक शाळेचा परिसर ११५ एकर सरकारी जमिनीमध्ये आहे. या परिसरातील काही इमारती ब्रिटीश काळातील १९२१ ते १९६१ मधील असून काही इमारती सन १९६१ मध्ये सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत बांधण्यात आलेल्या आहेत. सातारा सैनिकी स्कूल नियमावलीतील नियम क्र. १५.०४ नुसार, तसेच दिनांक ३०.१२.२०१६ रोजी झालेल्या सामंजस्य करारानुसार सातारा सैनिक शाळेच्या इमारत देशभाल व दुरुस्तीची जबाबदारी राज्य शासनाची आहे.

सबब, सातारा सैनिकी शाळेच्या नूतनीकरणासाठी रु. ११४.८५ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. (१) च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. सातारा सैनिकी शाळेच्या नूतनीकरणासाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात खर्च करण्यासाठी एकूण अंदाजपत्राकापैकी रु. १८.०० लक्ष (रुपये अठरा लक्ष फक्त) इतका निधी उपरोक्त संदर्भाधीन क्र. (२) येथील शासन निर्णयान्वये वितरीत केला आहे. सातारा सैनिकी शाळेच्या नूतनीकरणासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात खर्च करण्यासाठी एकूण अंदाजपत्रकापैकी रु.५६.८५ लक्ष (रुपये छप्पन लाख पंच्याऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सातारा सैनिकी शाळेच्या नूतनीकरणासाठी “मागणी क्रमांक ई-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण-११०, अशासकीय माध्यमिक शाळांना सहाय्य (००) (०३) पूर्वाध्ययन सैनिकी शाळांना सहायक अनुदान (२२०२०४६९), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी रु. ५६,८५,०००/- ( रुपये छप्पन लाख पंच्याऐंशी हजार फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून तसेच शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, सातारा यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र. क्र. ७५/अर्थ-३, दिनांक १८.४.२०१७ व क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र. ९४/अर्थ-३, दिनांक ३०.६.२०१७ च्या परिपत्रकातील आदेशांचे काटेकोर पालन करणे आवश्यक राहील.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. (२) येथील शासन परिपत्रक, दिनांक ०८.०७.२०१९ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२०७१७१९०१६४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2019.12.09 12:52:46 +05'30'

**( इ.मु.काझी )**
**सह सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. अपर मुख्य सचिव, (शालेय शिक्षण )मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
४. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सहायक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे
६. शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, सातारा.
७. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
८. प्रधान महालेखापाल(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
१०. वरीष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
११. प्राचार्य, सैनिकी स्कूल, सातारा
१२. सचिव, संरक्षण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
१३. मानद सचिव, बोर्ड ऑफ गव्हर्नस सैनिकी स्कूल, नवी दिल्ली.
१४. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. वित्त विभाग,व्यय-५/अर्थसंकल्प-३ मंत्रालय,मुंबई-३२
१६. निवड नस्ती (एसएम-६)